**जलसंपदा विभागातील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांच्या दिनांक ०१.०४.१९८१ ते दिनांक ३१.१२.१९९७ या कालावधीच्या ज्येष्ठतासूचीत सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक ज्येष्ठता ११०९/(२२२/२००९) आ.(तांत्रिक),**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२ .**
**दिनांक :- ०५/०८/२०११**

**परिपत्रक:-**

जलसंपदा विभागात कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) पदावर दिनांक ०१.०४.१९८१ ते दिनांक ३१.१२.१९९७ या कालावधीत नियुक्ती दिलेल्या कनिष्ठ अभियंत्यांची अंतिम ज्येष्ठतासूची शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक ज्येष्ठता ११०७/(११/२००७) आ.(तांत्रिक) , दिनांक २०.०३.२००७ अन्वये प्रसिध्द करण्यात आली होती. सदर ज्येष्ठतासूचीमध्ये श्री वा. ना. पाठक , शा. अ यांच्या ज्येष्ठता सूचीमध्ये जात प्रवर्गात अनुसूचित जमाती अशी नोंद घेण्यात आली आहे. तथापि, त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्याने शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-२००२/प्र.क्र. ९३/०४/१६-ब, दि. ३० जून, २००४ च्या तरतूदीनुसार श्री. वा. ना. पाठक यांच्या सुधारित ज्येष्ठतेबाबतची नोंद पुढीलप्रमाणे घेण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| विद्यमान ज्येष्ठता क्र. | : | ८३९३ |
| सुधारित ज्येष्ठता क्र. | : | ९८४४ अ-१ |
| नांव | : | श्री वा. ना. पाठक |
| जात प्रवर्ग | : | भ. ज. (क). |
| जन्मदिनांक | : | ०४/०४/१९५९ |
| शैक्षणिक अर्हता | : | डी. सी. ई. |
| क.अ. म्हणून नियुक्तीचा दिनांक | : | १५.०६.१९९५ |

वर नमूद केलेलया सुधारित नोंदीबाबत श्री वा. ना. पाठक यांना कळविण्याची जबाबदारी संबंधित मंडळ कार्यालयाची राहील, याची नोंद घ्यावी. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक २०११०८०५१६१३२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( द. अ. शिंदे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :- अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ, अमरावती.
प्रत :- आ.(शा.अ.)/आ.(ज्येष्ठता)/आ.(वर्ग २) कार्यासने , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रत :- आ.(तांत्रिक ) संग्रहार्थ .